**जिल्हा परिषदांच्या कार्यक्रम अंदाजपत्रकाच्या कामासाठी निर्माण केलेल्या अस्थायी पदांना दिनांक ०१ ऑक्टोबर, २०१९ ते २९ फेब्रुवारी,२०२० पर्यंत पुढे सुरु ठेवण्यास मंजुरी देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

ग्राम विकास विभाग

शासन निर्णय क्रमांकः झेडपीए-२०१७/प्र.क्र.०९/वित्त-९

बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ

फोर्ट, मुंबई-४००००१

तारीख: १० ऑक्टोबर,२०१९.

वाचा -

१. शासन निर्णय क्र. काअप २००८/प्र.क्र. ३८५/वित्त-९ दिनांक ७ एप्रिल, २००८.
२. शासन निर्णय क्रमांक: झेडपीए-२०१७/प्र.क्र.०९/वित्त-९ दि.०९ ऑक्टोबर, २०१८
३. शासन निर्णय क्रमांक: पदनि २०१६/प्र.क्र. ८/१६/आ.पु.क., दि.२१ फेब्रुवारी, २०१९
४. शासन निर्णय क्रमांक: झेडपीए-२०१७/प्र.क्र. ०९/वित्त-९ दि. ११ एप्रिल, २०१९
५. शासन निर्णय क्रमांक: पदनि २०१६/प्र.क्र. ८/१६/आ.पु.क. दि.११ सप्टेंबर, २०१९

**शासन निर्णय -**

जिल्हा परिषदांच्या कार्यक्रम अंदाजपत्रकाच्या कामासाठी निर्माण करण्यात आलेल्या ५६ अस्थायी पदांपैकी ४५ अस्थायी पदांना उपरोक्त संदर्भाधीन क्र. १ येथील शासन निर्णयान्वये स्थायी करण्यास मान्यता देण्यात आलेली आहे. उर्वरीत ११ अस्थायी पदांना संदर्भ क्र. ४ च्या निर्णयान्वये दिनांक ०१ मार्च, २०१९ ते ३० सप्टेंबर, २०१९ या कालावधीकरीता मुदतवाढ देण्यात आली होती. सदरहु कालावधी संपुष्टात आल्याने वित्त विभाग शासन निर्णय दि.११ सप्टेंबर, २०१९ अन्वये या विभागास दिलेल्या अधिकारांतर्गत या आदेशान्वये पुढील विवरणपत्रात दर्शविण्यात आलेल्या ११ अस्थायी पदांना दिनांक ०१ ऑक्टोबर, २०१९ ते २९ फेब्रुवारी, २०२० पर्यंत मुदतवाढ देण्यास शासन मंजुरी देत आहे.

| अ.क्र. | जिल्हा परिषदेचे नाव | ज्या पदांना मुदतवाढ मागितली आहे ती पदे (स्तंभ क्र. ३+४ =५) | | |
|---|---|---|---|---|
| | | वरिष्ठ सहाय्यक | कनिष्ठ सहाय्यक | एकूण |
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | ठाणे | १ | - | १ |
| २ | धुळे | १ | - | १ |
| ३ | सातारा | - | १ | १ |
| ४ | कोल्हापूर | - | १ | १ |
| ५ | जालना | १ | १ | २ |
| ६ | हिंगोली | - | १ | १ |

| अ.क्र. | जिल्हा परिषदेचे नाव | ज्या पदांना मुदतवाढ मागितली आहे ती पदे (स्तंभ क्र. ३+४ =५) | | |
|---|---|---|---|---|
| ७ | बुलढाणा | १ | १ | २ |
| ८ | नागपूर | - | १ | १ |
| ९ | चंद्रपूर | - | १ | १ |
| एकूण | | ४ | ७ | ११ |
| एकूण (स्तंभ क्रमांक ३+४ )=११ पदे | | | | |

या प्रयोजनासाठी होणारा खर्च प्रधानशीर्ष "२०५३-जिल्हा प्रशासन-(०९३) जिल्हा आस्थापना (५) स्थानिक क्षेत्रातील योजना (०५)(०२) जिल्हा परिषद कार्यक्रम अंदाजपत्रके (२०५३०७५२) (राज्यक्षेत्र) (योजनेत्तर) (मागणी क.एल-२)" या लेखाशीर्षाखाली सन २०१९-२०२० या आर्थिक वर्षासाठी मंजूर झालेल्या तरतुदीतुन भागविण्यात यावा.

हा शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय क्रमांक: पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क. दि.११ सप्टेंबर, २०१९ अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक **२०१९१०१०१४४५३९५७२०** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRAVIN DEVICHAND JAIN

Digitally signed by PRAVIN DEVICHAND JAIN
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=c7f82404d3bf725fa292c76bb1649f4e73505a8c846f3f83bdee9968a87f1d6c, postalCode=400001, street=MANTRALAYA,MUMBAI, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=PRAVIN DEVICHAND JAIN
Date: 2019.10.10 15:59:55 +05'30'

**(प्रवीण जैन )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखाकार (स्थानिक संस्था ) महाराष्ट्र-१/महाराष्ट्र-२, मुंबई/नागपूर
२. महालेखाकार (स्थानिक संस्था)
३. सर्व विभागीय आयुक्त (महसुल)
४. संचालक तथा मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई
५. सर्व सह मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा (कोकण/नाशिक/पुणे/ नागपूर /औरंगाबाद/अमरावती)
६. सर्व सहसचिव/उपसचिव, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
७. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
८. सर्व जिल्हा परिषदांचे अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी

९. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी
१०. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
११. वित्त विभाग (व्यव-१५/अर्थ-१७/वित्त आयोग कक्ष)
१२. ग्राम विकास विभाग, का.क्र. आस्था ४,६,८
१३. मा. प्रधान सचिव (ग्रा.वि. व पं.रा.) यांचे स्वीय सहाय्यक
१४. निवडनस्ती (वित्त-९)